कोषागारातून रोख स्वरुपात देय

सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षाकरीता वाहन कराचा माहे जून २०११ ते डिसेंबर,२०११ या सात महिन्याकरीता दुसरा हप्ता.

३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रक्कमा देणे- भारीत- मागणी क्रमांक एल-५ मुंबई वाहनांवरील कर अधिनियम १९५८ मधील कलम ११(२) अन्वये भूतपूर्व जिल्हा स्थानिक मंडळांना देय असलेली वाहनांवरील करापोटी भरपाईची रक्कम संबधीत जिल्हा परिषदांना देणे. (३६०४०२९२)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. बीयुडी -२०११/प्र.क्र. ५२३० /वित्त-३(२४)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : १३ जुलै, २०११.

वाचा : शा.नि.क्र.बीयुडी २०११/प्र.क्र.५२३१/वित्त - ३ (२४), दिनांक ९ मे,२०११

शासन निर्णय -

मुंबई मोटार वाहनावरील कर अधिनियम १९३५ मधील कलम ९ आणि मुंबई मोटार वाहनांवरील कर अधिनियम १९५८ (ज्यायोगे १९३५ चा अधिनियम रद्द करण्यांत आला) मधील कलम ११ च्या तरतूदीनुसार भूतपूर्व जिल्हा स्थानिक मंडळांना काही ठराविक भरपाईच्या देय असलेल्या रकमा महाराष्ट्र जिल्हा परिपदा व पंचायत समित्या अधिनियम,१९६१ मधील कलम २८८ नुसार त्या अधिनियमाला जोडलेल्या अनुसूची ११ च्या परिच्छेद २(अ) व (ब) अन्वये उत्तराधिकारी संस्था म्हणून संबंधित जिल्हा परिषदांना देय आहेत. त्यानुसार जिल्हा परिषदांना वाहनांवरील करापोटी भरपाईची रक्कम देता यावी म्हणून सन २०११-२०१२ या चालू वित्तीय वर्षी रुपये ५,४४,०००/- (रुपये पांच लाख चव्वेचाळीस हजार फक्त) एवढया रकमेची तरतूद करण्यांत आली आहे. सदर तरतुदीपैकी माहे जून, २०११ ते डिसेंबर, २०११ या सात महिन्याकरीता रुपये ९२,०००/- ( रुपये ब्याण्णव हजार फक्त ) एवढया रकमा या शासन निर्णयाव्दारे संबधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अधिनस्त देण्यात आल्या आहेत.

२. आता जून २०११ ते डिसेंबर २०११ या सात महिन्यांकरीता दुस-या हप्त्यासाठी रुपये ३१६०००/- (रुपये तीन लाख सोळा हजार फक्त) एवढा रकमा या शासन निर्णयान्वये या

सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधीत जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारीअधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहेत. अश्या प्रकारे माहे डिसेंबर २०११ पर्यंत एकूण रु. ४,०८,०००/- (रुपये चार लाख आठ हजार फक्त ) इतकी वाहन कराची रक्कम संबंधीत जिल्हा परिषदांना सुपूर्द करण्यांत आली आहे.

३. या शासन निर्णया सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ क्रमांक ६ मध्ये दर्शविलेल्या रकमेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी घ्यावी.

४. या बाबीवर होणारा खर्च ग्राम विकास व जलसंधारण विभाग मागणी क्र. एल-५, ३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रक्कमा देणे-भारीत-१०५ वाहनांवरील कर (३६०४०२९२) या लेखाशीर्षाखाली दाखवावा व सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षासाठी अधिनस्त ठेवलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

५. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हा परिषदांना मंजूर केलेल्या उपरोक्त लेखाशीर्षाखाली खर्ची पडलेल्या रकमेबाबतची माहिती शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग क्र. आरसीएन १०८९/सीआर ३०२७/२८, दि. ५ सप्टेंबर, १९९० ला जोडलेल्या विहीत प्रपत्रात भरुन या कार्यासनास पाठवावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०११०७१३१४५३२५००१ असा आहे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:अंदाज-१०.१० /सीआर-६५/ २०१०/अर्थसंकल्प-३, दिनांक ३१ मार्च,२०११ व पत्र क्रमांक बीजीटी२०११/प्र.क्र.३६/वित्त-१, दि.७/६/११ अनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( प्रि. शं. कावळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रती,
१) विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक व पुणे विभाग.
२) सहाय्यक आयुक्त विकास कोकण, नाशिक व पुणे विभाग.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व परिक्षा ) मुंबई ( ५ जादा प्रतींसह ).
४) महालेखापाल , महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई ( ५ जादा प्रतींसह).
५) जिल्हा कोषागार अधिकारी, जि.ठाणे रत्नागिरी, सिधुदुर्ग, रायगड, नाशिक, जळगांव, धुळे, नंदुरबार, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर व कोल्हापूर.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे, रत्नागिरी, सिधुदुर्ग, रायग नाशिक, जळगांव, धुळे, नंदुरबार, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर व कोल्हापूर .
७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, रायगड,नाशिक, जळगांव, धुळे, नंदुरबार, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर व कोल्हापूर.
८) मुख्य लेखा परिक्षक व स्थानिक निधी लेखा,कोकण भवन,बेलापूर,नवी मुंबई,
९) उप मुख्य लेखा परिक्षक व स्थानिक निधी लेखा कोकण ,पुणे विभाग.
१०) वित्त विभाग (का.क्र.व्यय १५, वीयुडी १६ अर्थोपाय) ,मंत्रालय, मुंबई.
११) कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-७, वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई .
१२) निवड नस्ती का.क्र.वित्त-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. १३) संगणक कक्ष ,ग्रा.वि.व.ज.सं.वि., मंत्रालय, मुंबई.

एच-१२९२-२.

## विवरण पत्र

मुंबई वाहनांवरील कर अधिनियम १९५८ मधील कलम ११(२) अन्वये भूतपूर्व जिल्हा स्थानिक मंडळांना देय असलेली वाहनावरील करापोटी भरपाईची रक्कम संबंधित जिल्हा परिषदांना देणे बाबत. माहे जून २०११ ते डिसेंबर २०११ या सात महिन्याकरीता दुसरा हप्ता. ( शासन निर्णय क्रमांक :वीयुडी-२०११/ प्र.क्र. ५२३०/वित्त-३. )

दिनांक : १३ जुलै, २०११ चे सहपत्र.)

(आकडे रुपयात)

| अ.क्र | जिल्हयाचे नांव | २०११-२०१२ या वित्तीय वर्षा-साठी मंजूर तरतूद रक्कमा (रुपये) | माहे जून ११ ते डिसेंबर, २०११ या सात महिन्याकरीता मंजूर करावयाचा दुसरा हप्ता. ( रुपये ) | अक्षरी (रुपये ) | या शासन निर्णया पर्यंत मंजूर केलेली एकूण रक्कम. ( रुपये ) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ठाणे | ११३४४४ | ६५९०० | रुपये पासष्ठ हजार नऊशे फक्त | ८४८०० |
| २ | रायगड | २३५४३ | १३७०० | रुपये तेरा हजार सातशे फक्त | १७५०० |
| ३ | रत्नागिरी | ११२२४ | ६५०० | रुपये सहा हजार पाचशे फक्त | ८३०० |
| ४ | सिंधुदुर्ग | ६१२३ | ३६०० | रुपये तीन हजार सहाशे फक्त | [illegible]०० |
| ५ | नाशिक | १८४८५ | १०७०० | रुपये दहा हजार सातशे फक्त | [illegible]०० |
| ६ | धुळे | ३६९५ | २१०० | रुपये दोन हजार एकशे फक्त | ३१०० |
| ७ | नंदुरबार | ३०२३ | १८०० | रुपये एक हजार आठशे फक्त | २८०० |
| ८ | जळगांव | ६७१०४ | ३९००० | रुपये एकोणचाळीस हजार फक्त | ५०५०० |
| ९ | अहमदनगर | १७१७२ | १०००० | रुपये दहा हजार फक्त | १३००० |
| १० | पुणे | ११५३२ | ६७०० | रुपये सहा हजार सातशे फक्त | ८५०० |
| ११ | सातारा | १४८७६ | ८६०० | रुपये आठ हजार सहाशे फक्त | ११११०० |
| १२ | सांगली | १३१६५ | ७६०० | रुपये सात हजार सहाशे फक्त | ९८०० |
| १३ | सोलापूर | ३३६०२ | १९५०० | रुपये एकोणीस हजार पाचशे फक्त | २५१०० |
| १४ | कोल्हापूर | २०७०१२ | १२०३०० | रुपये एक लाख वीस हजार तीनशे फक्त | १५४८०० |
| १५ | एकूण | ५४४००० | ३१६००० | रुपये तीन लाख सोळा हजार फक्त | ४०८००० |

( प्रि.रा.कांबळे )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन